# महाराष्ट्र शासन

क्रमांकः एमसीए १०११/(२५३/२०११)/अर्थ-२

जलसंपदा विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांकः- २६ ऑगस्ट, २०११

**विषयः-** शासकीय अधिकाऱ्यांना २०११-२०१२ या वित्तीय वर्षामध्ये नवीन मोटार कार खरेदी करण्यासाठी निधी उपलब्धता प्रमाणपत्र.

**ज्ञापनः-**

अधीक्षक अभियंता (वि.गृ.), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक,
अधीक्षक अभियंता, पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण मंडळ, नागपूर
अधीक्षक अभियंता, कोयना (विवयां) उभारणी मंडळ, सातारा,
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद
अधीक्षक अभियंता, औरंगाबाद पाटबंधारे मंडळ, औरंगाबाद
अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्तर) मंडळ, औरंगाबाद
अधीक्षक अभियंता, उर्ध्व वर्धा प्रकल्प मंडळ, अमरावती

समासातील नियंत्रक अधिकारी यांना कळविण्यात येते की, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-अग्रिम-१०९३/प्र.क्र.१४/९३/विनियम, दिनांक १/४/१९९३, क्रमांक- अग्रीम १०९३/ प्र.क्र.१६३/ १४/ विनियम, दिनांक २५.३.१९९४, क्रमांक अग्रिम १०९९/ प्र.क्र.१६/९९/ विनियम, दिनांक १०.३.२००० क्रमांक अग्रीम २०१० / प्र.क्र.२६ / १० / विनियम, दिनांक १७.७.२०१० व क्रमांक अग्रीम (व्याजदर)/२०.१०/प्र.क्र.२२/ विनियम, दिनांक २४.६.२०१० मध्ये दर्शविलेल्या अटीच्या अधीन राहून सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार नवीन मोटार कार खरेदीसाठी एकूण रु.१५,९०,०००/- (रुपये पंधरा लक्ष नव्वद हजार फक्त) चे अग्रिम मंजूर करण्यास निधी उपलब्ध करण्यात येत आहे.

२. उपरोक्त अग्रिमाची नोंद सेवापुस्तकात घेण्याची दक्षता घ्यावी, तसेच कर्मचाऱ्यांची बदली झाल्यानंतर त्यांचे अंतिम वेतन प्रमाणपत्र देताना त्यामध्ये अग्रिमाच्या हप्त्याच्या अनुषंगाने आवश्यक नोंद घेण्यात यावी. मोटार कार अग्रिम कर्मचाऱ्यास / अधिकाऱ्यास सेवा कालावधीत एकदाच देय राहील.

३. यासंबंधी होणारा खर्च मागणी क्रमांक आय-७ खाली '७६१० शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे (२००) मोटार वाहनांच्या खरेदीसाठी अग्रिमे (योजनेत्तर)' (संगणक संकेतांक क्रमांक ७६१० ०४२-५) या शीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हे पत्र रवाना झाल्याच्या तारखेपासून एक महिन्याच्या आत अग्रिम मंजूर करुन अग्रिमाची रक्कम अर्जदारास त्वरित अदा केली जाईल याची दक्षता घेण्यात यावी.

५. अग्रिमाची रक्कम अदा केल्यावर दोन महिन्याच्या आत महालेखापाल कार्यालयात जाऊन खर्चमेळ जुळविल्याचे महालेखापाल कार्यालयातील कक्ष अधिकाऱ्यांच्या स्वाक्षरीचे प्रमाणपत्र विहित विवरणपत्रात शासनास सादर करावे.

६. जर अर्जदार आपल्या कार्यालात कार्यरत नसतील तर ते ज्या कार्यालयात कार्यरत असतील त्या नियंत्रक अधिकाऱ्यांचे नाव शासनास हे प्रमाणपत्र मिळाल्यानंतर त्वरित उलटटपाली कळवावे.

७. सदरहू ज्ञापन हे वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र.२३०/व्यय-१२, दिनांक १२ जुलै, २०११ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०११०८२६१७०२२४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( म. गो. महाले )**
**कार्यासन अधिकारी**

सहपत्रः विवरणपत्र.

प्रतः- अर्थ-२ कार्यासन (संग्रहार्थ)

# विवरणपत्र

**शासन ज्ञापन क्र. एमसीए-१०११/(२५३/२०११)/अर्थ-२, दिनांक २६ ऑगस्ट, २०११ चे सहपत्र**

**(रुपये लक्ष)**

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | पदनाम | कार्यालयाचे नांव | मूळ वेतन | मंजूर अग्रीम |
|---|---|---|---|---|---|
| १ | बी.आर.जगताप | शा.अ. | अ.अ. (वि.गृ.),मध्यवर्ती संकल्पचित्र सं., नाशिक | २२८९०/- | १.८० |
| २ | रा.र.डोंगरे | शा.अ. | अ.अ., पा.प्र.अ.मंडळ, नागपूर | २२८९०/- | १.८० |
| ३ | शं. के. थोरात | कार्यकारी अभियंता | अ.अ., कोयना (विवयां) उभारणी मंडळ, सातारा | २५७६०/- | १.८० |
| ४ | सु. उ. कांबळे | शाखा अभियंता | अ.अ., कोयना (विवयां) उभारणी मंडळ, सातारा | २१६९०/- | १.७३ |
| ५ | जी. आर. पाटील | शाखा अभियंता | अ.अ.व प्र.,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद | २३४७०/- | १.८० |
| ६ | पी. जी. सुदामे | शाखा अभियंता | अ.अ.व प्र.,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद | २२२९०/- | १.७८ |
| ७ | बं. रा. पाले | शाखा अभियंता | अ.अ., औरंगाबाद पाटबंधारे मंडळ, औरंगाबाद | २४६६०/- | १.८० |
| ८ | सु. पं. आकोसकर | शाखा अभियंता | अ.अ., लघु पाटबंधारे (स्था.स्तर) मंडळ,औरंगाबाद | २४८००/- | १.८० |
| ९ | सं. बा. चित्ते | शाखा अभियंता | अ.अ., उर्ध्व वर्धा प्रकल्प मंडळ, अमरावती | १९९३०/- | १.५९ |
| | | | | **एकूण-** | **१५.९०** |

**( म. गो. महाले )**
**कार्यासन अधिकारी**